**शासकीय दूध योजनेंतर्गत दूध खरेदीच्या दरात व वितरक कमिशन दरामध्ये सुधारणा करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१३/प्र.क्र.९८/पदुम ८**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.

दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, एमएलके-१००९/१०३७५/प्र.क्र.७१/पदुम-८, दिनांक १३.८.२००९.
२) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, एमएलके-२०१३/प्र.क्र.९८/पदुम-८, दिनांक १९.६.२०१७.
३) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, क्रमांक एमएलके २०१६/प्र.क्र.९४(अ)/पदुम ८, दिनांक १०.८.२०१७.
४) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, क्रमांक एमएलके २०१३/प्र.क्र.९८/पदुम ८, दिनांक १५.१०.२०१६.
५) शासन निर्णय क्रमांक, कृषि व पदुम विभाग, लवेसू-२०१८/प्र.क्र.८/पदुम-८, दिनांक ३१.७.२०१८.
६) प्रदत्त समितीच्या दिनांक १३.८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील शासकीय दूध योजनेकरीता दूधाचे खरेदी व विक्री दर निश्चित करण्याकरीता सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली "प्रदत्त समिती" नियुक्त करण्यात आली आहे. सदर समितीची दिनांक १३.८.२०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधीन क्रमांक ६ अन्वये निर्गमित करण्यात आले आहे. प्रदत्त समितीच्या उपरोक्त बैठकीत संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या गाय दूध खरेदी दरात सुधारणा करणे तसेच संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या "आरे भूषण" या दूधाच्या विक्री दरामध्ये सुधारणा करणे व संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या शासकीय दूध योजनेअंतर्गत वितरकांना देण्यात येणाऱ्या दूध कमिशन दरात सुधारणा करण्याचा प्रस्ताव विचारात घेण्यात आला होता.

प्रदत्त समितीने सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शासकीय दूध खरेदी दरात सुधारणा करणे, "आरे भूषण" या दूधाच्या विक्री दरात सुधारणा करणे व शासकीय दूध योजनेअंतर्गत दूध वितरकांना देण्यात येणाऱ्या कमिशन दरामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

शासन या निर्णयान्वये शासकीय दूध योजनेकरीता खरेदी करण्यात येणाऱ्या गाय दूध व म्हैस दूध खरेदी दरात रुपये २/- प्रति लिटर इतकी कपात करण्यास मान्यता देत असून, त्यानुसार ३.५% फॅट व ८.५% एसएनएफ या गुणप्रतीच्या गाय दूधाकरीता रुपये २५/- प्रति लिटर व ६.०% फॅट व ९.०% एसएनएफ या गुणप्रतीच्या म्हैस दूधाकरीता रुपये ३४/- प्रति लिटर असा सुधारित खरेदी दर निश्चित करण्यात येत आहे.

२. तसेच "आरे भूषण" या फोर्टीफाईड टोण्ड दूधाकरीता संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या विक्री दरामध्ये सुधारणा करण्यात येऊन सदर दर खालीलप्रमाणे निश्चित करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

अ) बृहन्मुंबईसाठी आरे भूषण दूधाचे विक्री दर रु.३७/- प्र.लि. व रु.१८.५० प्रतिअर्धा लिटर असे असतील.

ब) उर्वरित महाराष्ट्राकरीता आरे भूषण दूधाचे विक्री दर रु.३६/- प्र.लि. व रु.१८/- प्रति अर्धा लिटर असे असतील.

३. तसेच, शासनामार्फत दूध वितरकांना यापूर्वी टप्पेनिहाय रु.२.५० ते रु.३.५० प्रतिलिटर असे कमिशन दर संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले होते. सदर दरामध्ये सुधारणा करण्यात येऊन टप्पेनिहाय कमिशन दराऐवजी सरसकट सदर कमिशन रुपये ३/- प्रति लिटर (वाहतुक कमिशनसह) असा कमिशन दर देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त सर्व निर्णयांची अंमलबजावणी दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ पासून लागू करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१२४४३५२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture & ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2018.09.27 12:49:21 +05'30'

**( राजेश गोविल )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (पदुम)/ राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव.

४) विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगांव, मुंबई
९) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे/ नागपूर/ मुंबई/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती.
१०) महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
११) अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३) निवडनस्ती.